सुधारीत हायब्रीड ॲन्युईटी योजना राबविण्याकरीता
येणा-या वाढीव खर्चास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२१/प्र.क्र.११४ /नियो-१अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २९ ऑगस्ट,२०२४.

**वाचा :** सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२१/प्र.क्र.११४/नियो-१अ, दि.०५.०२.२०२४

**प्रस्तावना:-**

मा. मंत्रीमंडळाच्या दिनांक ५ फेब्रुवारी २०२४ रोजीच्या बैठकीत सुधारीत हायब्रीड ॲन्युईटी योजना हाती घेणे व योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळामार्फत करणेबाबत निर्णय घेण्यात आला असून यानुषंगाने वाचा येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

सुधारीत हायब्रीड ॲन्युईटी या योजने अंतर्गत रस्त्यांची डांबरीकरणा ऐवजी सिमेंट कॉंक्रीटीकरणाद्वारे (PQC/ White topping) सुधारणा करणेबाबत मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत निर्णय घेण्यात आला होता. मा.मंत्रीमंडळात झालेल्या निर्णयानुसार या योजनेंतर्गत हाती घेण्यात येणाऱ्या एकूण ६००० कि.मी. रस्ते लांबीची सुधारणा करण्यासाठी अपेक्षित असलेल्या वाढीव खर्चास (रु.८४६४ कोटी) व त्या अनुषंगाने, देय ठरणाऱ्या शासन सहभागाच्या वाढीव रक्कमेस (रु.२५८९ कोटी) तसेच MSIDC ला पुढील १५ वर्ष देय असलेल्या वाढीव ॲन्युईटी (रु.५८७५ कोटी) च्या रकमेस व तद्नुषंगिक बाबींना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक १३ ऑगस्ट, २०२४ रोजीच्या बैठकीत सुधारीत हायब्रीड ॲन्युईटी योजना राबविण्याकरीता येणारा वाढीव खर्च व इतर बाबींना मान्यता देणेबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार सुधारीत हायब्रीड ॲन्युईटी योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने खालील बाबींना मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) सुधारीत हायब्रीड ॲन्युईटी योजनेंतर्गत रस्ते सुधारणा प्रकल्प हाती घेण्याच्या अनुषंगाने एकूण ६००० कि.मी. लांबीचे रस्ते डांबरीकरण करून सुधारणा करणे करीता रु.२८५०० कोटी रक्कमेच्या कामांना दि.०५.०२.२०२४ रोजीच्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत मान्यता प्रदान करण्यात आली. तथापि, सदर बैठकीत झालेल्या निर्णयानुसार ६००० कि.मी. लांबीच्या रस्त्यांचे डांबरीकरणा ऐवजी सिमेंट कॉंक्रीटीकरणाद्वारे (PQC/ White topping) सुधारणा करण्यासाठी एकूण प्रकल्प किंमत रू.२८५०० कोटी ऐवजी रु.३६९६४ कोटी इतक्या अंदाजित किंमतीस मान्यता देण्यात येत आहे.

२) सुधारीत हायब्रीड ॲन्युईटी योजनेंतर्गत शासन सहभागाची रक्कम रु.८५०० कोटी यात रु.२५८९ कोटी इतकी वाढ होऊन एकूण शासन सहभागाची रक्कम रु.११०८९ कोटी इतकी राहील.

३) सदर योजनेंतर्गत MSIDC सहभागाची रक्कम रु.२०००० कोटी यात रु.५८७५ कोटी इतकी वाढ होऊन रक्कम रु.२५८७५ कोटी इतकी राहील.

४) मा.मंत्रीमंडळ टिप्पणीमधील परिच्छेद “५.६ अ मधील पर्याय III” नुसार MSIDC सहभागाची रक्कम १५ वर्षात महामंडळास उपलब्ध करून देणेबाबत खालील सूत्रानुसार परिगणीत होणारी annuity देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४.१. MSIDC ला वित्तीय पुरवठा करणाऱ्या संस्थेकडून सर्वसाधारणपणे ३ वर्ष बांधकाम कालावधीमध्ये कमाल ९.२५% प्रती वर्ष दरावर आधारीत IDC (बांधकाम कालावधीतील व्याज) रू.४८०३ कोटी कमाल मर्यादेस मान्यता देण्यात येत आहे.

४.२. MSIDC ला वित्तीय पुरवठा करणाऱ्या संस्थेकडून सर्वसाधारणपणे देखभाल व दुरूस्तीच्या १२ वर्षाच्या कालावधीत कमाल ९% प्रती वर्ष दरावर आधारीत देखभाल दुरूस्ती कालावधीतील व्याजाची रक्कम रू.१७,७७४ कोटी कमाल मर्यादेत राहील.

५) वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार MSIDC या संस्थेस एजन्सी चार्जेस म्हणून एकूण मूळ प्रकल्प किंमतीच्या १% म्हणजे रु. २८५ कोटी अनुज्ञेय राहतील.

६) सदर ६००० कि.मी. लांबीचे रस्ते MSIDC ला १७.५ वर्ष कालावधीकरीता हस्तांतर करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर कामे महामंडळामार्फत EPC तत्वावर कंत्राटदाराची नियुक्ती करून कार्यान्वयीत करण्यात येत आहे. सदर रस्ते काँक्रीटीकरण करण्यात येणार असल्याने वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार प्रकल्प बांधकाम कालावधी २.५ वर्ष व १० वर्ष दोष दायित्व कालावधी नंतर ५ वर्षाकरीता सा.बां.विभागाच्या मानकानुसार वार्षिक देखभाल व दुरूस्ती तत्वावर प्रती वर्ष आवश्यक निधी महामंडळास उपलब्ध करण्यात येईल.

७) सुधारीत हायब्रीड ॲन्युईटी योजनेसाठी वित्त विभागाकडून अतिरीक्त नियतव्यय उपलब्ध करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८२९१२४२४३३६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2024.08.29 12:58:13 +05'30'

**( ग.सं.कचरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव

२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव

३) मा. उप मुख्यमंत्री (गृह,विधी व न्याय,जलसंपदा व लाभक्षेत्र विकास, उर्जा, राजशिष्टाचार) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

४) मा.उप मुख्यमंत्री(वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा.मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

६) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय,मुंबई

७) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई

८) सचिव (रस्ते / बांधकामे), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई

९) सर्व मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग

१०) सर्व सह/उप सचिव , सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) सर्व अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ

१२) निवड नस्ती (नियोजन-१अ), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई